राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर, २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रीवादळामुळे झालेल्या अवेळी पावसामुळे शेतीपिकाच्या नुकसानीपोटी आपद्ग्रस्तांना विशेष दराने मदत देण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-११/२०१९/प्र.क्र.८१/म-११

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ३० जून, २०२०

वाचा-

१) शासन निर्णय क्रमांकः सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दि.१३.०५.२०१५.

२) शासन निर्णय क्रमांकः सीएलएस-२०१९/प्र.क्र.१९१/म-३, दि.१८.११.२०१९.

३) शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-११/२०१९/प्र.क्र.८१/म-११, दि.१९.११.२०१९.

४) शासन निर्णय क्रमांकः सीएलएस-२०१९/प्र.क्र.१९१/म-३, दि.१३.१२.२०१९.

५) शासन पत्र क्रमांकः एससीवाय-११/२०१९/प्र.क्र.८१/म-११, दि.१३.१२.२०१९.

६) शासन निर्णय क्रमांकः पूरक-२०१९/प्र.क्र.१९८/म-३, दि.१.०२.२०२०.

७) शासन पत्र क्रमांकः एससीवाय-११/२०१९/प्र.क्र.८१/म-११, दि.३.०२.२०२०.

८) शासन निर्णय क्रमांकः पूरक-२०१९/प्र.क्र.१९८/म-३, दि.२९.६.२०२०.

प्रस्तावना-

माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर, २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रीवादळामुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यातील ३४९ तालुक्यांमध्ये शेतीपिकांचे मोठया प्रमाणात नुकसान झाले आहे. सदर नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित झालेल्या शेतकऱ्यांना विशेष दराने मदत देण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णय दि.१८.११.२०१९ अन्वये निर्णय घेण्यात आला आहे. तद्नुसार, संदर्भाधीन शासन निर्णय दि.१९.११.२०१९ व संदर्भाधीन पत्र दि.१३.१२.२०१९ व दि.३.२.२०२० अन्वये आतापर्यंत रु.७३,०९,३६,६५,०००/- (अक्षरी रुपये सात हजार तीनशे नऊ कोटी छत्तीस लाख पासष्ट हजार फक्त) इतका निधी संबंधितांना बीम्सप्रणालीद्वारे वितरीत करण्यात आलेला आहे. आता संदर्भाधीन शासन निर्णय दि.२९.६.२०२० नुसार मान्यता दिल्याप्रमाणे, रु.३२६,२२,५०,०००/- (अक्षरी रुपये तीनशे सव्वीस कोटी बावीस लाख पन्नास हजार फक्त) इतक्या निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे संबंधितांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर, २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रीवादळामुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यातील ३४९ तालुक्यांमध्ये शेतीपिकांचे मोठया प्रमाणात नुकसान झाले आहे. सदर नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित झालेल्या शेतकऱ्यांना विशेष दराने मदत देण्यासाठी शासन निर्णय दि.२९.६.२०२० अन्वये मान्यता दिल्याप्रमाणे, विभागीय आयुक्त, पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर यांना

पुढील तक्यात नमूद केल्यानुसार, रु.३२६,२२,५०,०००/- (अक्षरी रुपये तीनशे सव्वीस कोटी बावीस लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभाग | शासन निर्णय दि.२९.६.२०२० नुसार वितरीत करावयाचा निधी (रु.लाखात) |
|---|---|---|
| १. | पुणे | १५३.९९ |
| २. | औरंगाबाद | २४९३६.९५ |
| ३. | अमरावती | ७००८.२४ |
| ४. | नागपूर | ५२३.३२ |
| | एकूण | ३२६२२.५० |

२. उपरोक्त निधी सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्ती सहाय्य ०२, अतिवृष्टी, १०१, अनुग्रह सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांनुसार खर्च, (९१) (०५) पीक नुकसानीमुळे शेतकऱ्यांना मदत (२२४५ २४५२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून विभागीय आयुक्त, पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर यांना वरीलप्रमाणे अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे, या शीर्षाखाली तो अंतीमत: खर्ची दाखविण्यात यावा. तसेच शासन निर्णय दि.२९.६.२०२० सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे निधी वाटपाच्या मर्यादेतच संबंधित जिल्ह्यांना निधी वितरीत होईल, याची कृपया दक्षता घ्यावी.

३. बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करताना शासननिर्णय संदर्भ क्रमांक १ व २ मधील अटी, शर्तीची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी व त्यात नमूद मार्गदर्शक सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

४. शासन निर्णय दि.२९.६.२०२० सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे जिल्ह्यांना निधी वितरित केल्यानंतर, जिल्ह्यांनी सदर रकमेचे वाटप झाल्यानंतर, रक्कम वाटप करण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी त्यांना प्रदान केलेल्या रकमेच्या माहितीसह, त्या-त्या जिल्हाधिकारी कार्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावी.

५. अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BDS) वर उपलब्ध निधी अनावश्यक रीतीने कोषागारात आहरीत करुन तो वाटपा अभावी बँकेत पडून राहणार नाही, याची काटेकोर दक्षता घेण्याचे आदेश वेळोवळी देण्यात आलेले आहेत. असे असतानाही कोषागारातून रक्कम आहरीत करुन बँकेत ठेवले असल्याच्या बाबी निदर्शनास आल्या आहेत. यास्तव निधी आहरीत करुन बँकेत ठेऊ नये, अशा सक्त सूचना या शासन निर्णयान्वये पुन:श्च देण्यात येत आहेत. अशी बाब आढळून आल्यास त्याला तात्पुरता अपहार समजून संबंधितांवर शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल, याची सर्वांनी नोंद घ्यावी.

६. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची संबंधित विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख/नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात यावे. तसेच झालेल्या खर्चाचा कोषागार कार्यालय व महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी त्रैमासिक ताळमेळ घेऊन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

७. नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित व्यक्तींना वाटप करण्यासाठी वितरित करण्यात येणारा निधी तालुकास्तरावरील आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये हस्तांतरित केला जातो. काही बँका लाभार्थ्यांचे नाव, खाते क्रमांक जुळत नाही अशा तांत्रिक कारणास्तव परत आलेला निधी निलंबन (Suspense) खात्यात ठेवतात. वास्तविक पाहता बँकाकडे वर्ग करण्यात आलेली रक्कम एकतर लाभार्थ्यांच्या खात्यात जमा होणे आवश्यक आहे किंवा परत आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या खात्यात जमा होणे आवश्यक आहे. तथापि, आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या खात्यात अशा रकमा जमा करण्याऐवजी बँका त्या निलंबन खात्यामध्ये ठेवतात. कालांतराने अशा रकमा ताळमेळविना राहतात आणि ज्या रकमा शासनाकडे परत जमा व्हावयास हव्या त्या बँकाकडे पडून राहतात. याला आळा घालण्यासाठी ठराविक कालावधीने सदर रकमांचा ताळमेळ घेणे अत्यंत गरजेचे आहे. तरी सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी दर आठवडयाला वर्ग करण्यात येणाऱ्या रकमांचा ताळमेळ घेण्याची दक्षता घ्यावी.

८. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत मा. सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण/उपशीर्षाच्या "संगणक यंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत. तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०३१३१०४२७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

प्राचीपालव

(प्राची सुभाष पालव)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग),

२. विभागीय आयुक्त, पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.

३. आयुक्त ( कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. सचिव (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल -१/२ ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
७. वित्तिय सल्लागार व सह सचिव, मदत व पुनर्वसन, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
८. वित्त विभाग, व्यय -९/(अर्थसंकल्प कक्ष ), मंत्रालय, मुंबई.
९. महसुल व वन विभाग, ( म-३), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवड नस्ती, (कार्यासन म-११).